राज्य मानवी हक्क आयोगाच्या कार्यालयाकरीता एम.टी.एन.एल., कफ परेड येथील इमारतीच्या पाचव्या मजल्यावरील सुमारे ६००० चौ.फु. जागा उपलब्ध करण्यास तसेच सदर जागेच्या भाडयापोटी येणा-या दरमहा आवर्ती खर्चास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

### शासन निर्णय क्रमांकः एसएचआरसी-०६१७/प्र.क्र.१५६/पोल-१४

२ रा मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०९ ऑगस्ट २०१७

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक एसीडी-१०८६/१९९९६९/७०२/मि.व्य(१),दिनांक ०७ नोव्हेंबर,१९८६**
2) **प्रधान सचिव, राज्य मानवी हक्क आयोग यांचे पत्र क्रमांक एसएचआरसी/६/२०१७/६४१, दिनांक २१ जून २०१७**

प्रस्तावना -

श्री नरेश गोसावी विरुध्द राज्य मानवी हक्क आयोग या मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र. ११५/२०१३ मध्ये राज्य मानवी हक्क आयोगामार्फत मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या शपथपत्रांमध्ये राज्य मानवी हक्क आयोगाचे कामकाज सुरळित व प्रभावीपणे पार पाडण्यासाठी आयोगाच्या शासनाकडील प्रलंबित प्रस्तावांमध्ये आयोगाच्या कार्यालयाकरीता पुरेशी जागा उपलब्ध करण्याबाबतच्या प्रस्तावाचा समावेश आहे. राज्य मानवी हक्क आयोगाच्या शासनाकडील विविध प्रस्तावांसंदर्भात निर्णय घेण्यासाठी सर्व संबंधितांची आयोगाच्या कार्यालयात बैठक घेण्यांत यावी असे आदेश दिनांक १९ ऑक्टोबर,२०१६ रोजी मा. उच्च न्यायालयाने पारित केले होते. त्याअनुषंगाने राज्य माहिती आयोगाच्या कार्यालयात दिनांक १० जानेवारी, २०१७ आणि दिनांक २७ जानेवारी, २०१७ रोजी बैठका संपन्न झाल्या आहेत. सदर न्यायालयीन प्रकरणी दिनांक १०.०३.२०१७ रोजीच्या सुनावणीअंती एअर इंडिया किंवा एमटीएनएल च्या अखत्यारीतील इमारतीमध्ये राज्य मानवी हक्क आयोगाच्या कार्यालयाकरीता ५००० ते ८००० चौ. फु. जागा उपलब्ध करण्याबाबत विचार करण्यांत यावा असे आदेश मा. उच्च न्यायालयाने पारित केले आहेत. त्याअनुषंगाने राज्य मानवी हक्क आयोगाने सादर केलेल्या संदर्भिय क्रमांक २ प्रस्तावाची संदर्भिय क्रमांक १ येथील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिपत्रकानुसार छाननी करण्यांत आली. सदर छाननीअंती राज्य मानवी हक्क आयोगाच्या कार्यालयाकरीता एम.टी.एन.एल. च्या कफ परेड येथील इमारतीत पाचव्या मजल्यावरील ६००० चौ.फु. जागा उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावनेच्या अनुषंगाने राज्य मानवी हक्क आयोगाच्या कार्यालयाकरीता एम.टी.एन.एल. च्या कफ परेड येथील इमारतीतील पाचव्या मजल्यावरील ६००० चौ.फु. जागा उपलब्ध करण्यास तसेच सदर जागेच्या भाडयापोटी येणा-या (६००० चौ.फु x रुपये २९० प्रति चौ.फु.) रुपये १७,४०,०००/- दरमहा इतक्या आवर्ती खर्चास याद्वारे मान्यता देण्यांत येत आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने आयोगस्तरावर एम.टी.एन.एल. व्यवस्थापन, कफ परेड यांचेशी विहित पध्दतीने करारपत्र तयार करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्त विभागाने दिनांक २७ जूलै, २०१७ रोजी दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१०१५४२२०९७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Uday B Kannav
Date: 2017.08.10 16:27:35 +05'30'

**( उ. बा. काण्णव )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत उचित कार्यवाहीसाठी**

१. प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, हजारीमल सोमाणी मार्ग, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस समोर, मुंबई ३२.
२. व्यवस्थापक, स्थावर मालमत्ता, इस्टेट डिव्हिजन, एम.टी.एन.एल., मुंबई
३. लेखाअधिकारी, महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग, हजारीमल सोमाणी मार्ग, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस समोर, मुंबई ३२
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. महालेखापाल (१/२) लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रत माहितीसाठी
७. अपर मुख्य सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,